**संगणक प्रशिक्षण घेतलेल्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना चाचणी परिक्षेच्या सरावासाठी प्रश्नावलीची सी.डी. उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
क्रमांक :प्रशिक्षण१०००/१५३६/प्र.क्र.१७६/२०००/३९
मंत्रालय, ४०० ०३२
दिनांक: २७ जुलै २००१

परिपत्रक:-

ज्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांनी शासन मान्य खाजगी संगणक संस्थांमार्फत संगणक प्रशिक्षण घेऊन परीक्षा उत्तीर्ण केल्याचे प्रमाणपत्र प्राप्त केलेले आहे अशांची चाचणी परीक्षा महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळा मार्फत घेण्यात येते. या चाचणी परीक्षेच्या सरावासाठी महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाने प्रश्नावलीची सी.डी. तयार केलेली असून ती महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाच्या प्रादेशिक कार्यालयात विक्रीसाठी उपलब्ध आहे.

प्रश्नावलीच्या सीडी ची किंमत प्रती सीडी रु. १००/- आहे. संबंधित कार्यालयांनी महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाच्या कार्यालयातून प्रश्नावलीची सी.डी. खरेदी करुन ती आपल्या कार्यालयातील प्रशिक्षण केंद्रात अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सरावासाठी लोड करावी.

याबाबत असेही नमुद करण्यात येते की, ज्या अधिकारी/कर्मचारी चाचणी परीक्षेच्या सरावासाठी प्रश्नावलीची सी.डी. वैयक्तीकरित्या खरेदी करु इच्छित असतील तर व्यक्तीगत खरेदीसाठी प्रती सी.डी. रु.७०/- या दराने विक्रीसाठीही महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाच्या प्रादेशिक कार्यालयात सीडी उपलब्ध आहेत. आपणास विनंती करण्यात येते की, वरील प्रमाणे आवश्यक ती उपाय योजना करुन वरील बाबी त्यांच्या नियंत्रणाखालील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या तात्काळ निदर्शनास आणाव्यात.

महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाच्या प्रादेशिक कार्यालयांचे पत्ते खालील प्रमाणे आहेत:-

१) उप सचिव,महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, प्रादेशिक कार्यालय बहिरट पाटील चौक, ४१२, ई, पहिला मजला, शिवाजी नगर, पुणे ४११ ०१६

२) उप सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ प्रादेशिक कार्यालय, गव्हर्मेन्ट पॉलीटेक्निक कॅम्पस, सदर, नागपूर ४४० ००१.

३) उप सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ प्रादेशिक कार्यालय, गव्हर्मेन्ट पॉलीटेक्निक कॅम्पस, उस्मानपुरा, औरंगाबाद ४१३००५

GR-2002042212 5729000-0104

C:\lotus\work\wordpro/Order

[कृ.मा.प.

४) प्रभारी कार्यालय प्रमुख,
मुंबई उप प्रादेशिक,महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, २रा मजला, ४९ खेरवाडी,
अलीयावर जंग मार्ग, बांद्रे (पु.) मुंबई ४०० ०५१.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

डॉ. रमेशचंद्र सागर
सह सचिव तथा संचालक (मा.तं.)

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव
उपमुख्य मंत्री यांचे सचिव
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय (विधानसभा), मुंबई
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय (विधान परिषद), मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र नागपूर
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा ) महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र, नागपूर
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,लेखाकोष भवन, वांद्रे (पूर्व),मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार कार्यालये
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखाली सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती (दोन प्रती)

—x—

GR-200204221257290000-0104